श्री.दत्ता गोविंदा ढोबळे, सहाय्यक सरकारी अभियोक्ता, गट-अ यांचा राजीनामा मंजुर करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन आदेश क्रमांक :- डीपीपी-१०२१/प्र.क्र.१४१/पोल-१०**

**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**

**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.**

**दिनांक :- ०७ डिसेंबर, २०२१**

संदर्भ :-

(१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : एसआरव्ही-१०९२/ १०३३/ प्र.क्र. ३३/९२/८ दि.०२.१२.१९९७.

(२) संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. सअइनि/ १३२/७५३/२०२०, दि.१५.०९.२०२१.

(३) संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.सअईनि/ १३२/२०९७/२०२१, दि.१६.११.२०२१.

**प्रस्तावना :-**

सहाय्यक संचालक व सरकारी अभियोक्ता, अमरावती यांच्या आस्थापनेवर श्री.दत्ता गोविंदा ढोबळे, हे दि.२९.०९.२०१७ रोजी परिविक्षाधीन सहाय्यक सरकारी अभियोक्ता, गट-अ या पदावर नियुक्त झाले होते. ते न्यायालय क्र.०२, चांदुर बाजार, अमरावती येथे कार्यरत होते. श्री. दत्ता गोविंदा ढोबळे, सहाय्यक सरकारी अभियोक्ता यांनी महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत झालेल्या दिवाणी न्यायाधीश कनिष्ठ स्तर व प्रथमवर्ग न्यायदंडाधिकारी या पदाची मुख्य परिक्षा दिली होती. सदर परिक्षेच्या पुर्व, मुख्य व मुलाखतसाठी ते पात्र झाले आहेत. सदर पदावर संभाव्य नियुक्ती स्विकारण्यासाठी सद्य:स्थितीत पदाचा राजीनामा तांत्रिक औपचारीकता म्हणून दिली असून, त्यांचा राजीनामा स्विकृतीबाबत संदर्भाधीन क्र.२ अन्वये संचालक, अभियोग संचालनालय यांनी विनंती केलेली आहे. तथापि, श्री. ढोबळे यांनी दिवाणी न्यायाधीश कनिष्ठ स्तर तथा प्रथमवर्ग न्यायदंडाधिकारी या पदाच्या परिक्षेसाठी संचालनालयाची परवानगी घेतलेली नाही. त्यामुळे त्यांना कार्यमुक्त न करता राजीनामा स्विकृत करण्याचे शासनास प्रस्तावित केले आहे. सबब, श्री. दत्ता गोविंदा ढोबळे यांचा राजीनामा स्विकृत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन आदेश :-**

श्री. दत्ता गोविंदा ढोबळे, सहाय्यक सरकारी अभियोक्ता (गट-अ), मुंबई हे सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयामधील परिच्छेद क्र.११ मधील अ ते ड येथील विहित अटींची पूर्तता करीत असल्याने, तसेच श्री. ढोबळे यांच्याकडून कोणतेही

शासकीय येणे बाकी नाही व त्यांच्या विरुध्द कोणतीही विभागीय चौकशी प्रलंबित अथवा प्रस्तावित नाही, असे संदर्भाधीन पत्र क्र.२ अन्वये प्राप्त सहपत्रामध्ये सहाय्यक संचालक व सरकारी अभियोक्ता, अमरावती यांनी कळविले आहे. सबब, संदर्भाधीन क्र. ३ च्या पत्रान्वये संदर्भ क्र.१ अन्वये शासन निर्णयामधील परिच्छेद क्रमांक २(इ) मधील तरतुदीनुसार श्री. दत्ता गोविंदा ढोबळे, सहाय्यक सरकारी अभियोक्ता (गट-अ) या पदाचा राजीनामा मंजूर करण्यात येत आहे व संदर्भ क्र.२ अन्वये त्यांना दिनांक १५.१०.२०२० (म.नं.) पासून शासनाच्या सेवेतून मुक्त करण्यात येत आहे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०२११२०७१५२०४९०९२९ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Tushar Dilip Rathod

Digitally signed by Tushar Dilip Rathod
DN: CN = Tushar Dilip Rathod, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = HOME DEPARTMENT
Date: 2021.12.07 15:28:19 +05'30'

**( तुषार दि. राठोड )**

**कार्यासन अधिकारी , महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) अपर मुख्य सचिव (अ व सु.) यांचे स्वीय सहायक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३) उपसंचालक, अमरावती परिक्षेत्र कार्यालय, अमरावती.
४) सहाय्यक संचालक व सरकारी अभियोक्ता, अमरावती
५) श्री. दत्ता गोविंदा ढोबळे, सहाय्यक सरकारी अभियोक्ता (संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचेमार्फत)
६) निवडनस्ती (पोल-१०)